**<u>आस्थापना मंडळाच्या विचारार्थ सादर करण्यात येणारे पदोन्नतीचे प्रस्ताव</u> तपासणीसूची.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : ईएसबी-१११६/प्र.क्र.१८१/१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २२ नोव्हेंबर, २०१६

<u>वाचा</u> : शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग, क्र.ईएसबी-१११४/प्र.क्र.२४६/१३, दि.१६ मे, २०१४.

**शासन परिपत्रक -**

आस्थापना मंडळापुढे राज्य शासनाच्या सेवेतील रु.७६००/- आणि अधिक ग्रेड वेतन असलेल्या पदांवरील पदोन्नतीसाठी सादर होणारे प्रस्ताव विहीत विवरणपत्रात आणि आवश्यक जोडपत्रांसह सादर करण्याच्या सूचना संदर्भाधीन दि.१६.०५.२०१४ च्या परिपत्रकान्वये निर्गमित केल्या आहेत.

२. दि.१६.०५.२०१४ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार प्रस्ताव आस्थापना मंडळाच्या शिफारशींसाठी सामान्य प्रशासन विभागाकडे सादर करताना प्रथम सोबत जोडलेल्या तपासणीसूचीमध्ये (Check List) नमूद सर्व माहिती व कागदपत्रांची पुर्तता झाल्याची खातरजमा करण्यात यावी. या तपासणीसूचीनुसार सर्व कागदपत्रांची पुर्तता न करता प्राप्त होणारे प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागाव्दारे नाकारण्यात (Summarily rejected) येतील. त्यामुळे परिपूर्ण प्रस्ताव सादर करण्याची दक्षता संबंधित विभागाने घ्यावी.

३. उक्त परिच्छेदात नमूद केल्यानुसार तपासणी करुन सामान्य प्रशासन विभागामध्ये स्विकारण्यात आलेल्या प्रस्तावामध्ये काही त्रुटी निदर्शनास आल्यास त्यांची पूर्तता १५ दिवसांत करणे आवश्यक राहील.

४. निवडसूची वर्षात पदोन्नतीसाठी उपलब्ध होणाऱ्या पदांवर पदोन्नती देण्याची प्रक्रिया संबंधित निवडसूची वर्षातच पूर्ण होणे अपेक्षित आहे. त्यामुळे ज्या निवडसूची वर्षात प्रस्ताव सादर करण्यात येत आहे त्यापुर्वीच्या काही वर्षाच्या निवडसूच्या तयार करण्यात आल्या नसल्यास संबंधित निवडसूची वर्षात पदोन्नतीसाठी उपलब्ध होणाऱ्या पदांसाठी स्वतंत्र आरक्षण निश्चिती करुन “प्रत्येक वर्षाची स्वतंत्र निवडसूची” तयार करण्याचा प्रस्ताव एकत्रितपणे सादर करावा.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१६११२२१६१४५३१४०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Khalid B Arab

Digitally signed by Khalid B Arab
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=17b1bdae334a3efab8ffa330885658eb14b09969ecbab94b7f20dfd8f09f568b, cn=Khalid B Arab
Date: 2016.11.22 16:17:05 +05'30'

**( खालिद बी. अरब )**
**उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई, (५ प्रती)
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, (५ प्रती)
३. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/विधान सभा , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व विधान सभा/विधान परिषद सदस्य,महाराष्ट्र विधानमंडळ
६. मा.अध्यक्ष,महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव
७. मा.सभापती,महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव.
८. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
९. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
१०. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (पत्राने).
११. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१२. *सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ प्रादेशिक विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख
१३. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१५. निवडनस्ती,कार्यासन-१३,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२
*पत्राने

**शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.ईएसबी-१११६/प्र.क्र.१८१/१३, दि.२२.११.२०१६ सोबतची**

# तपासणीसूची

१) प्रस्तावाच्या छाननीचे मुद्दे (दि.१६.०५.२०१४ च्या परिपत्रकान्वये विहीत)

२) जोडपत्र अ, ब, क, ड मधील परिपुर्ण माहिती (दि.१६.०५.२०१४ च्या परिपत्रकान्वये विहीत)

३) प्रस्ताव ज्या निवडसूची वर्षासाठी सादर केला आहे त्या निवडसूचीचे वर्ष प्रस्तावाच्या विषयामध्ये ठळकपणे नमूद करावे.

४) ज्या पदावर पदोन्नती द्यावयाची आहे त्या पदाच्या सेवाप्रवेश नियमाची प्रत

५) ज्येष्ठता यादी (प्रस्ताव ज्या निवडसूची वर्षासाठी सादर केला आहे त्या वर्षाच्या लगतपुर्व १ जानेवारीची अद्ययावत अंतिम ज्येष्ठता सूची)

६) पदोन्नतीच्या पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या

७) पदांच्या आढाव्याची (आकृतीबंध) प्रत/पदनिर्मितीच्या शासन निर्णयाची प्रत

८) विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांच्या विभागीय चौकशीची संक्षिप्त माहिती दर्शविणारी टिप्पणी

९) विचारक्षेत्रातील मागासवर्गीय अधिकाऱ्यांच्या जात वैधता प्रमाणपत्रांच्या छायांकित प्रती.

१०) रिक्त पदांवरील आरक्षणाला सा.प्र.वि./मागास वर्ग कक्षाच्या मान्यतेच्या टिप्पणीची प्रत (एकाकी पद असल्यास आवश्यकता नाही.)

११) पदोन्नतीच्या पदासाठी यापुर्वीच्या आस्थापना मंडळाच्या शिफारशीसंबंधीच्या पत्राची प्रत

१२) विचारक्षेत्रातील ज्या अधिकाऱ्यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी करावयाचे पुनर्विलोकन लागू आहे त्या अधिकाऱ्यांचे ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकनाअंती निर्गमित केलेल्या आदेशांची प्रत.

१३) विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांच्या परिपूर्ण गोपनीय अहवाल धारिका (ज्या निवडसूची वर्षासाठी विचार करण्यात येणार आहे त्यापूर्वीच्या ५ वर्षाच्या गोपनीय अहवाल/प्रमाणपत्रासह)